विश्व मराठी संमेलन २०२३ च्या आयोजनासाठी करण्यात आलेला खर्च अदा करण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेला अनुदान वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## मराठी भाषा विभाग
### शासन निर्णय क्रमांक : मभासं-२०२२/प्र.क्र.१४०/भाषा-२

८ वा मजला, नवीन प्रशासन भवन, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक : ०२ मार्च, २०२३

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३,दि. ०४.०४.२०२२
२. मराठी भाषा विभाग, शासन निर्णय क्र. मभासं-२०२२/प्र.क्र.१२५/भाषा-२, दि.२१.११.२०२२
३. राज्य मराठी विकास संस्थेचे पत्र क्र. रामविसं/विमसं/प्र.क्र.७४/प्रक्रल्प ३/७९/२०२३, दि. ३१.०१.२०२३
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. ०८.०२.२०२३

**प्रस्तावना :-**

दि. ४, ५ व ६ जानेवारी, २०२३ या कालावधीत भारतातील आणि भारताबाहेरील मराठी भाषिकांसाठी “मराठी तितुका मेळवावा” या विश्व मराठी संमेलनाचे आयोजन करण्यात आले होते. अभिजात मराठी साहित्याचे श्रवण व्हावे, पारंपरिक कला अभिव्यक्त व्हाव्यात, उद्योग कल्पनांचे आदान-प्रदान व्हावे यासाठी या संमेलनाचे आयोजन करण्यास संदर्भ २ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. मराठी भाषा विभागाच्या अधिनस्त असलेल्या राज्य मराठी विकास संस्था या स्वायत्त संस्थेसाठी असलेल्या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून संमेलनाचा खर्च करण्याचा निर्णय शासनस्तरावर घेण्यात आला आहे.

संदर्भ क्र. ३ अन्वये राज्य मराठी विकास संस्थेने संमेलनाचा एकूण खर्च रु. ८,६०,५९,८१४/- (अक्षरी रुपये आठ कोटी साठ लाख एकोणसाठ हजार आठशे चौदा फक्त) इतका होत असल्याचे नमूद केले आहे. त्यापैकी अग्रिम व अन्य स्वरुपात अदा करण्यात आलेली रक्कम रु. ३,३१,९०,११६/- (अक्षरी रुपये तीन कोटी एकतीस लाख नव्वद हजार एकशे सोळा फक्त) वगळता रु. ५,२८,६९,६९८/- (अक्षरी रुपये पाच कोटी अठ्ठावीस लाख एकोणसत्तर हजार सहाशे अठ्ठ्याण्णव फक्त) इतकी रक्कम देय आहे. तथापि, देय रकमेपैकी प्रस्तावात नमूद केलेल्या रु. ८०,२७,२७०/- (अक्षरी रुपये ऐंशी लाख सत्तावीस हजार दोनशे सत्तर फक्त) इतक्या रकमेची स्वतंत्र तपासणी करणे आवश्यक असून ती रक्कम एकूण रु. ५,२८,६९,६९८/- (अक्षरी रुपये पाच कोटी अठ्ठावीस लाख एकोणसत्तर हजार सहाशे अठ्ठ्याण्णव फक्त) मधून वजा केल्यास रु. ४,४८,४२,४२८/- (अक्षरी रुपये चार कोटी अठ्ठेचाळीस लाख

बेचाळीस हजार चारशे अठ्ठावीस फक्त) इतकी रक्कम तातडीने अदा करावयाची आवश्यकता आहे. राज्य मराठी विकास संस्थेस यापूर्वी उपलब्ध केलेल्या अनुदानापैकी रु. ८८,०९,८८४/- (अक्षरी रुपये अठ्ठ्याऐंशी लाख नऊ हजार आठशे चौऱ्याऐंशी फक्त) शिल्लक आहेत. त्यामुळे, उर्वरीत रु.४,४०,५९,८१४/- (अक्षरी रुपये चार कोटी चाळीस लाख एकोणसाठ हजार आठशे चौदा फक्त) एवढा निधी (२२०५ ३२०५ - ३१) योजनांतर्गत या लेखाशीर्षाखाली उपलब्ध करुन देण्याची विनंती राज्य मराठी विकास संस्थेने केली आहे.

राज्य मराठी विकास संस्थेच्या उपरोक्त प्रस्तावानुसार, देय रकमेपैकी रु. ८०,२७,२७०/- (अक्षरी रुपये ऐंशी लाख सत्तावीस हजार दोनशे सत्तर फक्त) इतक्या रकमेची स्वतंत्र तपासणी करणे आवश्यक असल्याने, तपासणीनंतर त्याचा स्वतंत्र प्रस्ताव सादर करावा व सद्य:स्थितीत प्रलंबित देयके तातडीने अदा करणे आवश्यक असल्याने, तपासणीच्या अधीन असलेल्या देयकाच्या बाबी वगळता, उर्वरीत रु. ४,४८,४२,४२८/- (अक्षरी रुपये चार कोटी अठ्ठेचाळीस लाख बेचाळीस हजार चारशे अठ्ठावीस फक्त) या देय रकमेतून राज्य मराठी विकास संस्थेकडील शिल्लक रक्कम रु. ८८,०९,८८४/- (अक्षरी रुपये अठ्ठ्याऐंशी लाख नऊ हजार आठशे चौऱ्याऐंशी फक्त) वगळता रु. ३,६०,३२,५४४/- (अक्षरी रुपये तीन कोटी साठ लाख बत्तीस हजार पाचशे चव्वेचाळीस फक्त) इतकी खर्चाची देय रक्कम तातडीने अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

## शासन निर्णय:-

राज्य मराठी विकास संस्थेने नमूद केलेल्या विश्व मराठी संमेलनाच्या एकूण रु. ८,६०,५९,८१४/- (अक्षरी रुपये आठ कोटी साठ लाख एकोणसाठ हजार आठशे चौदा फक्त) खर्चापैकी, (२२०५ ३२०५) या लेखाशीर्षाखाली सन २०२२-२३ या वित्तीय वर्षासाठी वितरीत केलेल्या निधीमधून रु. ३,३१,९०,११६/- (अक्षरी रुपये तीन कोटी एकतीस लाख नव्वद हजार एकशे सोळा फक्त) इतका निधी अग्रिम व अन्य बाबींसाठी केलेल्या खर्चाची देयके यापूर्वी अदा केलेली आहेत. सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र त्यांनी सादर केले आहे. सदर रक्कम तसेच प्रस्तावात नमूद केलेल्या तपासणीच्या अधिन असलेला रु. ८०,२७,२७०/- (अक्षरी रुपये ऐंशी लाख सत्तावीस हजार दोनशे सत्तर फक्त) इतका खर्च वगळता उर्वरीत रु. ४,४८,४२,४२८/- (अक्षरी रुपये चार कोटी अठ्ठेचाळीस लाख बेचाळीस हजार चारशे अठ्ठावीस फक्त) इतक्या खर्चाची रक्कम अदा करावयाची आहे. या रकमेतून राज्य मराठी विकास संस्थेस यापूर्वी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या अनुदानापैकी शिल्लक असलेला रु. ८८,०९,८८४/- (अक्षरी रुपये अठ्ठ्याऐंशी लाख नऊ हजार आठशे चौऱ्याऐंशी फक्त) इतका निधी वगळता रु. ३,६०,३२,५४४/- (अक्षरी रुपये तीन कोटी साठ लाख बत्तीस हजार

पाचशे चव्वेचाळीस फक्त) इतके अनुदान राज्य मराठी विकास संस्थेस वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर अनुदान सशर्त असून प्रमाणित करण्यात येते की, सदर प्रकरणी वित्त विभाग शासन परिपत्रक दि. ०४.०४.२०२२ व दि. ०८.०२.२०२३ मध्ये नमूद केलेल्या अटींची पूर्तता होत आहे.

२. सदर खर्च राज्य मराठी विकास संस्थेसाठी असलेल्या "मागणी क्र. झेडएफ-२, २२०५, कला व संस्कृती, (००) १०२ कला व संस्कृती प्रचालन, (०२) कार्यक्रम, (०२) (०१) राज्य मराठी विकास संस्था (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०५ ३२०५)" या लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. सन २०२२-२३ या चालू वित्तीय वर्षाकरीता नियोजन व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे अनुदान वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र** | **लेखाशीर्ष तपशीलवार** | **सन २०२२-२३ चा अर्थसंकल्प निधी (रुपये)** | **वितरीत निधी (रुपये)** | **वितरीत करावयाचे अनुदान (रुपये)** |
|---|---|---|---|---|
| १ | मागणी क्र.झेडएफ-२, २२०५, कला व संस्कृती, (००) १०२ कला व संस्कृती प्रचालन, (०२) कार्यक्रम, (०२) (०१) राज्य मराठी विकास संस्था (कार्यक्रम), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२०५ ३२०५) | १०,००,००,०००/- | ४,२०,००,०००/- | ३,६०,३२,५४४/- |

४. राज्य मराठी विकास संस्थेने संदर्भ क्रमांक ३ येथील प्रस्तावात नमूद केल्यानुसारच विश्व मराठी संमेलनासाठी करण्यात आलेल्या खर्चाची देयके अदा करावीत आणि कोणतीही प्रशासकीय व वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. सदर खर्च करण्यासाठी कक्ष अधिकारी (रोख शाखा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून आणि अवर सचिव (रोख शाखा), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. राज्य मराठी विकास संस्थेने निधीच्या खर्चाचा तपशील व उपयोगिता प्रमाणपत्र विहित कालावधीत व विहित विवरणपत्रात शासनास सादर करावे.

७. प्रमाणित करण्यात येते की, या लेखाशीर्षांतर्गत कोणतेही संक्षिप्त देयकाचे तपशीलवार देयक सादर करणे प्रलंबित नाही.

८. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ५९/१४४३, दि. ०८.०२.२०२३ आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ८३/व्यय-४, दि. १६.०२.२०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२३०३०२१६५९३८५०३३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

RAJASHRI
UDAY BAPAT

Digitally signed by RAJASHRI UDAY BAPAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MARATHI LANGUAGE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0abe21e41785319194707f89dc0e9ab5156282f4a89952d9774a26fade711538, pseudonym=1DEE74EBDCF0A24FC413634E0199E666505E847B, serialNumber=2976929866C57C5B5B45C06BBD6C5983FE47BAD04262C22CB9EC519621A4899F, cn=RAJASHRI UDAY BAPAT
Date: 2023.03.02 17:03:37 +05'30'

**( राजश्री बापट )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, मराठी भाषा यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई
६. वित्त विभाग (व्यय-४/विनियम/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव (रोखशाखा/अर्थसंकल्प), मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. संग्रहार्थ (भाषा-२).